अंगणवाडी बांधकामाकरिता निधी वितरण.
(१३ वा वित्त आयोग)

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एबावि-२०२५/प्र.क्र.१८/का.०६**
नवीन प्रशासन भवन, ३रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १३ मार्च, २०२५

**संदर्भ:-** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१०/प्र.क्र.१५६/का.०६, दिनांक ०८.०२.२०१२
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/प्र.क्र.२४१/का.०६, दिनांक ३०.०३.२०१३
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१३/प्र.क्र.३६१/का.०६, दिनांक ३०.०३.२०१५
४) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि-२०२१/प्र.क्र.१४२/का.६, दिनांक १४.०२.२०२२
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का-७/अं.वाडी/१३ वा वित्त आयोग/२३-२४/१२३७, दिनांक १२.०३.२०२४
६) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. एबावि-२०२१/प्र.क्र.१६१/का.०६, दिनांक २०.०३.२०२४ व दिनांक २८.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजने मधील अंगणवाडी केंद्रांच्या बांधकामाकरिता १३ व्या वित्त आयोगाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या आधारे जिल्हानिहाय उद्दिष्ट निश्चित करून त्याप्रमाणे संदर्भाधीन क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयानुसार एकूण रुपये १४९.९७ कोटी एवढा निधी उपलब्ध करून देण्यात आला होता.

२. १३ व्या वित्त आयोगाकडून अंगणवाडी बांधकामाकरिता उपलब्ध करून दिलेला निधी उपयोजनात आणण्याच्या अनुषंगाने वित्त विभागाने दिलेल्या सूचना विचारात घेऊन यासंदर्भातील प्रस्ताव मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या दि. २५.०१.२०२४ रोजीच्या बैठकीमध्ये सादर करण्यात आला होता. सदर बैठकीमध्ये राज्यातील अंगणवाडी केंद्र बांधकामाकरिता १३ व्या वित्त आयोगाकडून प्राप्त झालेला निधी हा प्रति अंगणवाडी केंद्र बांधकाम रुपये ४.५० लाख प्रमाणे प्राप्त झाला असल्याने अखर्चित निधी (शासनास जमा केलेला व बँकामध्ये अडकलेला या दोन्ही बाबतीत) उपयोजनात आणून अंगणवाडी बांधकाम करताना प्रति अंगणवाडी बांधकाम रुपये ४.५० लक्ष प्रमाणे ठिकाणांमध्ये बदल करुन उद्दिष्ट निश्चित करण्यास मान्यता देण्यात आली. त्याचप्रमाणे अशा उद्दिष्टांकरिता संबंधित ठिकाणी अंगणवाडी बांधकाम करताना शासन निर्णय दिनांक १४.०२.२०२२ अन्वये लागू केलेले दर व १३ व्या वित्त आयोगाकरिता लागू असलेले दर (रुपये ४.५० लक्ष) यामधील फरकाची रक्कम ही जिल्हा वार्षिक योजना अथवा अंगणवाडी बांधकामाच्या इतर योजनांमधून प्राप्त करून घेऊन अंगणवाडी बांधकाम करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

३. मा. मुख्य सचिव अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीने वरीलप्रमाणे घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी १३ व्या वित्त आयोगाकडून अंगणवाडी बांधकामाकरिता प्राप्त झालेल्या अखर्चित निधीपैकी शासनास जमा करण्यात आलेला निधी रु. ४२०५.५६ लाख उपयोजनात आणण्याच्या अनुषंगाने जिल्ह्यांकडून अंगणवाडी बांधकाम करण्याकरिता उपलब्ध असलेली जागा, अशा ठिकाणी १३ व्या वित्त आयोगा अंतर्गत प्रति अंगणवाडी रुपये ४.५० लक्ष प्रमाणे निधी उपलब्ध करून दिल्यास सबंधित जिल्ह्यांची अंगणवाडी बांधकामाचा सध्याचा दर व रुपये ४.५० लक्ष याप्रमाणे फ़रकाची रक्कम जिल्हा वार्षिक योजना अथवा अन्य योजनांमधून प्राप्त करून घेऊन अंगणवाडी बांधकाम करण्याची तयारी या अनुषंगाने उद्दिष्ट निश्चित करणे व त्यानुषंगाने रक्कम अनुज्ञेय करणे यासंदर्भातील प्रस्ताव आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांचेकडून संदर्भाधीन क्र. ५ अन्वये सादर करण्यात आला होता. त्यास अनुसरून बीड जिल्ह्यामध्ये त्यांच्या मागणीनुसार ४९४ उद्दिष्टे निश्चित करून संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयांन्वये बीड जिल्ह्यास निधी वितरीत करण्यात आला होता. तथापि, जिल्हा वार्षिक योजनेमधून अभिसरणाद्वारे फ़रकाची रक्कम बीड जिल्ह्यास ४९४ पैकी केवळ ८० उद्दिष्टांकरिता प्राप्त करून घेणे शक्य झाले आहे. सबब, बीड जिल्ह्यातील उर्वरित ४१४ उद्दिष्टांपैकी ७१ अंगणवाडी बांधकाम करण्याकरिता प्रति अंगणवाडी फ़रकाची रक्कम रुपये ६.७५ लाख प्रमाणे निधी राज्यस्तरावरून उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१३ व्या वित्त आयोगाकडून अंगणवाडी बांधकामाकरिता प्राप्त झालेल्या निधीपैकी अखर्चित निधी उपयोजनात आणण्याच्या अनुषंगाने बीड जिल्ह्यातील निश्चित केलेल्या ४९४ अंगणवाडी बांधकामाच्या उद्दिष्टांपैकी ८० उद्दिष्टांकरिता फ़रकाची रक्कम जिल्हा वार्षिक योजनेमधून उपलब्ध करून घेतली असल्याने उर्वरित ४१४ उद्दिष्टांपैकी ७१ अंगणवाडी बांधकामाकरिता प्रति अंगणवाडी बांधकाम रु. ६.७५ लक्ष प्रमाणे फ़रकाची रक्कम एकूण रुपये ४.७९२५ कोटी (अक्षरी रुपये चार कोटी एकोणऐंशी लक्ष पंचवीस हजार फ़क्त) एवढा निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी सदर निधी बीड जिल्ह्यास संबंधित यंत्रणेला तात्काळ वितरीत करावा.

३. सदर मान्यता खालील अटी शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.:-

१) अंगणवाडी केंद्र इमारत बांधकाम शासन निर्णय दिनांक १५ जानेवारी, २०१० अन्वये विहित करण्यात आलेल्या नमुना आराखडाप्रमाणे (Type Plan) करण्यात यावे. त्याकरिता अंगणवाडी बांधकाम खर्चाची मर्यादा शासन निर्णय दिनांक १४ फ़ेब्रुवारी, २०२२ प्रमाणे राहील. त्याप्रमाणे अंगणवाडी बांधकाम पूर्ण करण्याबाबतची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

२) सदर प्रयोजनाकरिता उपलब्ध करून देण्यात आलेला निधी वेळेत उपयोजनात न आणल्यास संबंधितांवर जबाबदारी निश्चित करून प्रशासकीय कारवाई प्रस्तावित करण्यात यावी. तसेच उपलब्ध करून देण्यात येणारा निधी उपयोजनात आणण्याऐवजी बँकामध्ये अडकून राहणार नाही याबाबतची

जबाबदारी सबंधित जिल्हा कार्यक्रम अधिकारी व जिल्हा परिषदेचे मुख्य वित्त व लेखा अधिकारी यांची राहील.

४. वित्त विभागाच्या दि. ०६.०६.२००८ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदी व त्यानुषंगाने वित्त विभागाकडून देण्यात येणारे आदेश विचारात घेऊन अंगणवाडी बांधकाम पूर्ण करण्याबाबतची कार्यवाही विहित कालावधीत करून निधी उपयोजनात आणण्यात यावा. उर्वरित संबंधित अटी शर्ती संदर्भाधीन क्रमांक ६ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार राहतील.

५. सदर प्रयोजनासाठी मागणी क्र. एक्स ०१, २२३६-पोषण आहार, ०५१- बांधकाम, (०१) अंगणवाडी बांधकाम, (०१) (०३) अंगणवाडी इमारत बांधण्यासाठी अंमलबजावणी करणा-या संस्थांना अनुदान (अतिरिक्त राज्य हिस्सा १००%) (कार्यक्रम) (२२३६ २२०८), २७- लहान बांधकामे या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ करिता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून रु. ४.७९२५ कोटी इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ७८/१४७२, दिनांक ११.०२.२०२५ तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ ७३/व्यय-६, दिनांक २७.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१३१५५५४१४९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.03.13 17:44:14 +05'30'

(वि.रा.ठाकूर)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ / २ , मुंबई /नागपूर,
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड,
९. जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद, बीड,
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी वित्त विभाग (व्यय-६/अर्थ-७), नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई,
१४. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.,
१५. निवड नस्ती (का.६).